**महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण (म्हाडा)अंतर्गत एकल इमारतींचा पुनर्विकास न करता एकापेक्षा जास्त इमारती /संस्था/अभिन्यास यांचा समावेश करुन एकत्रित पुनर्विकासाचे प्रस्ताव विचारात घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : वाटप-२०२१/प्र.क्र.६०/गृनिभू**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
३ रा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २८ एप्रिल, २०२२.

**प्रस्तावना:-**

एकत्रित पुनर्विकास करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन असताना काही ठिकाणी एकल इमारतींच्या पुनर्विकासाचे प्रस्ताव म्हाडास प्राप्त होत आहेत. तथापि, अशा एकल इमारतींच्या पुनर्विकासामुळे त्या क्षेत्रात आवश्यक पायाभूत सुविधा उभारणे व त्यासंबंधित नियोजन करणे शक्य नाही. पर्यायाने एकल इमारतींच्या पुनर्विकासाला मान्यता दिल्यास संपूर्ण क्षेत्राचा समुचित विकास योजनाबध्द पध्दतीने होऊ शकत नाही. त्याअनुषंगाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

**शासन निर्णय:-**

मुंबई, कोकण, नाशिक व पुणे या म्हाडा अधिनस्थ मंडळांतर्गत ज्या अभिन्यासामध्ये अद्याप पुनर्विकासाची परवानगी देण्यात आलेली नाही, अशा ठिकाणी नियोजित पायाभूत सुविधांचा विकास व क्षेत्राचे समुचित नियोजन करणे शक्य व्हावे, यासाठी एकल इमारतींच्या पुनर्विकास प्रस्तावास कोणत्याही परिस्थितीत मान्यता देण्यात येऊ नये.

पुनर्विकास करावयाच्या क्षेत्रातील अधिकतम इमारती / संस्था/अभिन्यास यांचा समावेश करुन केवळ एकत्रित पुनर्विकासाच्या प्रस्तावांनाच मान्यता / ना-हरकत प्रमाणपत्र प्रदान करण्यात यावे.

अपवादात्मक परिस्थितीत एकल इमारतीच्या पुनर्विकास करणे गरजेचे असल्यास, त्याबाबतचा स्वयंस्पष्ट प्रस्ताव शासनाच्या पूर्व मान्यतेसाठी सादर करण्यात यावा व शासन मान्यता प्राप्त झाल्यानंतरच अशा एकल इमारतींच्या पुनर्विकास प्रस्तावास मान्यता/ ना-हरकत प्रमाणपत्र द्यावे.

सदर आदेशाचे उल्लंघन झाल्यास संबंधित जबाबदार अधिकाऱ्यांविरुध्द कडक कारवाई करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०५०६१६४१२६०४०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Narayan Khetle
Digitally signed by Ravindra Narayan Khetle
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=188518615e71d343f645c4620bd62f620f5f5af35f72932959997b73ec7e7c41, cn=Ravindra Narayan Khetle
Date: 2022.05.06 16:42:08 +05'30'

**(रविंद्र खेतले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

२. मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३. मा. राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. प्रधान सचिव (गृहनिर्माण), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
६. सर्व मुख्य अधिकारी, मुंबई/कोकण/पुणे/नाशिक, गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ
७. सर्व उप सचिव/अवर सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती (गृनिभू कार्यासन) , गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.